तात्काळ

हंगामी पदांचे कायम स्वरूपाच्या पदांमध्ये रुपांतर

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:टीओपी १०६८-खास पथक,
सचिवालय,मुंबई, दिनांक १८ ऑक्टोबर १९६८.

शासन परिपत्रक

हंगामी पदांचे कायम स्वरूपाच्या पदांमध्यें रुपांतर करण्यासंबंधी शासनाने वेळोवेळी खालील आदेश निर्गमित केले आहेत:-

(१) टीओपी-१०६०-५ दिनांक १२ जानेवारी १९६१.
(२) टीओपी-१०६०-५ दिनांक २१ मे १९६१.
(३) टीओपी-१०६३-४५७३-५ दिनांक १८ मार्च १९६३.
(४) टीओपी-१०६४-१४१८-५ दिनांक ७ सप्टेंबर १९६४.
(५) टीओपी-१०६७-१२१०६-२६४६-५ दिनांक १५ सप्टेंबर १९६७.
(६) टीओपी-१०६८-१८६३-६८-५ दिनांक ६ मे १९६८.

२. उपरिनिर्दिष्ट आदेशानुसार साधारणत: कायम स्वरूपाची कामे पार पाडण्यासाठी, कायम वा दीर्घ मुदतीवर लागणारी आणि तीन व अधिक वर्षे अस्तित्वात असलेली ८० टक्के पदे कायम करण्याची अनुज्ञा देण्यात आली आहे. परंतु तदनुसार करावयाच्या कार्यवाहीकडे ब-याचशा कार्यालयप्रमुखानी व संबंधीत अधिका-यांनी पाहिजे तेवढे लक्ष न पुरविल्यामुळें किंवा अन्य कारणानी हे काम कमी अधिक प्रमाणात अपूर्ण राहिले आहे. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे कीं, सकृतदर्शनी कायम करता येण्याजोगी कितीतरी पदे अद्यापी हंगामीच ठेवण्यांत येत आहेत. तसेच हंगामी पदे पुढे चालू ठेवण्यासंबंधीचे आदेशही वेळेवर काढले जात नाहीत. याबाबत योग्य ती उपाययोजना करण्याची जरूरी आहे.

३. खरे पाहता या संबंधीचे वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश विस्तृत व स्पष्ट आहेत, व त्या संबंधी आणखी स्पष्टीकरणाची गरज नाही. असे असूनही ज्याअर्थी या बाबतीत कार्यवाहीस विलंब लागत आहे, त्याअर्थी मुख्यत: संबंधीत अधिका-यांची या बाबतीतील शिथिलता, त्यांना येणा-या प्रात्यक्षिक अडचणी वगैरे मुळेच हे कार्य लांबणीवर पडत आहे. हंगामी पदे कायम करण्याच्या कामास अधिक विलंब लागू नये अशी शासनाची इच्छा आहे. संबंधित अधिका-यांचे या प्रश्नांकडे त्वरित लक्ष वेधून व त्यांच्या शंकाकुशंकाचे निरसन करून हंगामी पदांचे कायम स्वरूपात रुपांतर करण्याबाबतचे प्रस्ताव त्यांनीं शासनाकडे

(शामुमु)रोटा-एच्-९२१(५५००-१०-१०-६८)-१

शक्यतो लवकर पाठवावेत, म्हणून सचिवालयातील वित्त विभागामध्ये एक खास पथक निर्माण केले आहे. हे पथक विभागीय प्रमुख व संबंधीत कार्यालयांना भेट देईल व किती व कोणती हंगामी पदे कायम स्वरूपाची करता येतील या बाबत योग्य ते मार्गदर्शन करील.

४. या पथकास काम करण्यास सुकर व्हावे व त्यांना देण्यांत आलेले काम शक्यतो लवकर पुरे व्हावे या करितां सचिवालयाच्या निरनिराळ्या विभागाखालील विभागीय प्रमुख व कार्यालय प्रमुखांनी हंगामी पदांचे कायम स्वरूपात रूपांतर करण्याकरिता योग्य ते प्रस्ताव व त्यासाठी लागणारी सर्व माहिती, वर नमूद केलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, सोबत दिलेल्या विवरण पत्रानुसार दिनांक १ नोव्हेंबर १९६८ च्या आंत तयार ठेवावी व त्यांची एक प्रत सचिव, वित्त विभाग, सचिवालय, मुंबई-३२ व संबंधीत सचिवालय विभागां-कडे त्वरित पाठवावी.

५. या कार्यवाहीचे महत्व व तातडी लक्षांत घेऊन संबंधीत सर्व अधिकाऱ्यांनीं या कामास प्राधान्य द्यावे. तसेच पथकाला वेळोवेळी लागणारी सर्व माहिती तातडीने पुरवून पथकास जरूरते सहकार्य व मदत द्यावी.

६. सचिवालय विभागानांही अशी विनंती करण्यात येत आहे की त्यांनी त्यांच्या खालील संबंधीत विभागीय प्रमुख व कार्यालय प्रमुखांना योग्य त्या सूचना पाठवून या संबंधीचे प्रस्ताव खास पथकाच्या मदतीने लवकरांत लवकर तयार करून आपल्या अभिप्रायासह वित्त विभागाच्या संमतीसाठी अनौपचारीकरित्या पाठवावेत. अशा प्रस्तावांबरोबर खास पथकानें केलेल्या शिफारशीची एक प्रत ही ठेवावी.

७. पथकाची निरनिराळ्या कार्यालयांना भेट देण्याची निश्चित तारीख वगैरे संबंधी योग्य ती पत्रके आगाऊ पाठविण्यांत येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

जॉर्ज हरी,
उप-सचिव, वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल महाराष्ट्र, मुंबई,
वरिष्ठ उप महालेखापाल, महाराष्ट्र नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
सचिवालयाचे सर्व विभाग,
सचिवालयाच्या निरनिराळ्या विभागाखालील सर्व विभागीय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
वरिष्ठ उपसंचालक, लेखा परिक्षा, राज्य परिवाहन लेखा परीक्षा मंडळ, वरळी, मुंबई,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री व उपमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.

* पत्रांने

विवरण पत्रक

| क्रमांक | पदाभिधान | एकुण १-१०-१९६८ पर्यंत कायम असलेली पदें | १-१०-६८ पर्यंत तीन वर्षापेक्षां अधिक मुदतीची असलेली हंगामी पदे जी कायम करणे आहेत आणि जी कायम स्वरूपाच्या कामासाठी आवश्यक आहेत. | एक वर्षापेक्षां अधिक काळ असलेली हंगामी पदे (कलम ४ सह) | कलम ४ मधील पदांच्या ८० टक्के | एकुण पदे (कलम २+५) | किमान २० टक्के हंगामी पदांची संख्या जी शिल्लक ठेवणे आवश्यक आहे (कलम ७ चे २० टक्के) | कायम स्वरूपाची करण्या जोगी पदे १-१०-६८ पर्यंत (कलम ६ मधील पदें Limited to ५ मधील पदे उणे ८ मधील पदें) | वित्त विभागाच्या पथकाने मान्यता दिलेली पदें | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |

टीप:-१) वरील माहिती एकाच स्वर्गाप्रमाणे असावी. त्या त्या स्वर्गातील सर्व पदांचा एकत्र समावेश असावा.

२) इतर विभागातील कांहीं हंगामी पदे जर त्या विभागातील स्वर्गातील पदाशी तात्पुरती जोडलेली असतील, तर त्या विभागाच्या सल्ल्याने अशा पदांचाही समावेश करावा.

३) हंगामी पदे प्रथम ज्या आदेशान्वये निर्माण केली गेली व ज्या आदेशान्वये ती वेळोवेळी चालू ठेवण्यात आली त्या आदेशांच्या सही शिक्क्याच्या प्रती सोबत जोडाव्यात.

४) तसेच जी पदे कायम स्वरूपाची लागणार आहेत त्याबद्दलची ती कायम स्वरूपाची कामा प्रीत्यर्थच आहेत याबद्दलचे विवरण व प्रमाणपत्र सोबत जोडावे.